**जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबवावयाच्या "शासकीय महाविद्यालयांचा विकास" या जिल्हास्तरीय योजनेत संस्थाचा समावेश करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.७५/मशि-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०६ जून, २०२४.

वाचा :-

शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०१५/(३२०/१५)/मशि-३, दि.२९ डिसेंबर, २०१६.

प्रस्तावना :-

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत येत असलेल्या शासकीय संस्था/महाविद्यालये यामधील बांधकामे तसेच प्रयोगशाळा उपकरणे व साधनसामुग्री खरेदी तसेच आधुनिकीकरणाची कामे करण्यासाठी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत "शासकीय महाविद्यालयांचा विकास" या जिल्हास्तरीय योजनेतून निधी उपलब्ध करुन दिला जातो. सदर योजनेसाठी संदर्भिय दिनांक २९/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयामध्ये समाविष्ट केलेल्या महाविद्यालयीन संस्थांच्या यादीमध्ये उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागातंर्गत १) ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व २) ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर ह्या दोन संस्थाचा समावेश करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

जिल्हा नियोजन समिती कडून जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण योजना) अंतर्गत "शासकीय महाविद्यालयांचा विकास" या योजनेमध्ये संदर्भिय दिनांक २९/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयामधील अ.क्र.१ येथील मुंबई व अ.क्र.१३ येथील नागपूर या जिल्ह्यासमोरील नमूद महाविद्यालये/संस्था यांच्या नावांमध्ये अनुक्रमे ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर ह्या दोन संस्थाचा समावेश करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर संस्था उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाच्या अधिनस्त असल्याने योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना व निकष त्या विभागाकडून स्वतंत्रपणे विहित करण्यात येतील.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४८/१४८१, दिनांक ०१/१२/२०२३ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९२/२०२४/व्यय-१६, दिनांक १९/०३/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०६०६१७०३०१३४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by ASHOK S MANDE
Date: 2024.06.06 17:16:29 +05'30'

**( अशोक मांडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.मंत्री, कामगार यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. प्रधान सचिव (कामगार),उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. जिल्हाधिकारी तथा सचिव, जिल्हा नियोजन समिती, मुंबई.
९. जिल्हाधिकारी तथा सचिव, जिल्हा नियोजन समिती, नागपूर.
१०. संचालक,उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
११. संचालक, ना. मे. लोखंडे श्रम विज्ञान संस्था, परळ, मुंबई.
१२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५. कार्यासन १४८१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. कार्यासन व्यय-१६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. निवड नस्ती मशि-३, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.